रासायनिक खताचा संरक्षित साठा करण्याकरीता लागणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महसंघ मर्या., मुंबई यांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत-

## महाराष्ट्र शासन

### सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

### शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१२/प्र.क्र.२१५/२४ स,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: २२ जुलै, २०१४

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग क्र. राखते-२०१२/प्र.क्र.४५/१७-अे, दि.४.६.२०१२

२) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र. शाहमी-२०१२/सपवव/प्र.क्र.५५/अर्थबळ, दि. ४ ऑगस्ट, २०१२

३) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग क्र. राखते-२०१२/प्र.क्र.१९९/१७-अे, दि.२१ नोव्हेंबर, २०१२

४) शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपस-२०१२/प्र.क्र.२१५/२४-स, दि.८ ऑक्टोबर, २०१३

५) शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपस-२०१३/प्र.क्र.१८४/२४-स, दि.१४ फेब्रुवारी, २०१४

६) सरव्यवस्थापक (खत), दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई यांचे जा.नं.खत/अनुषंगिक खर्च/२०१४-१५/१८, दि. २१.४.२०१४

प्रस्तावना :-

खरीप हंगाम २०१२ करिता राज्यातील शेतकऱ्यांना त्यांच्या मागणीनुसार वेळेवर रासायनिक खताचा संरक्षित साठा करुन पुरवठा करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेची उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ नुसार नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. या कामाकरिता

आवश्यक असणाऱ्या कर्जासाठी शासन हमी तसेच अनुषंगीक खर्च या विभागाने उपलब्ध करुन देण्याचा निर्णय कृषि विभागाने घेतला होता. या करिता लागणाऱ्या रु. १०० कोटी रक्कमेच्या कर्जाकरिता वित्त विभागाने शासन हमी संदर्भाधीन अ.क्र. २ नुसार मंजूर केली होती. सदर रासायनिक खताचा साठा व पुरवठा करण्याकरिता येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी सन २०१४-२०१५ च्या अर्थसंकल्पात रु. २२ कोटी रकमेची तरतूद करण्यात आली आहे. या मंजुर निधी पैकी वित्त विभागाने रुपये ४,७५,७३,९८९/- (रुपये चार कोटी पंच्याहत्तर लाख त्र्याहत्तर हजार नऊशे एकोणनव्वद फक्त ) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

खरीप हंगाम २०१२ साठी राज्यातील शेतकऱ्यांना वेळेवर रासायनिक खताचा संरक्षित साठा करुन पुरवठा करण्यासाठीच्या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेला रु. ४,७५,७३,९८९/- (रुपये चार कोटी पंच्याहत्तर लाख त्र्याहत्तर हजार नऊशे एकोणनव्वद फक्त ) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. हा खर्च सन २०१४-२०१५ च्या खालील लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

"मागणी क्र. व्ही-२, मुख्यलेखाशिर्ष २४२५, सहकार, (००)(१०८), इतकर सहकारी संस्थांना सहाय्य, (०१) पणन सहकारी संस्था, (०१)(२१) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास रासायनिक खते खरेदी व पुरवठा यासाठी येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी अर्थसहाय्य (योजनेतर) (२४२५ २३७३) ३३, अर्थसहाय्य".

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी वापर करुन संबंधित फेडरेशनने त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल विनाविलंब शासनास सादर करावा.

४.  या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या रु. ४,७५,७३,९८९/- (रुपये चार कोटी पंच्याहत्तर लाख त्र्याहत्तर हजार नऊशे एकोणनव्वद फक्त ) चा धनादेश The Maharashtra State Co-operative Marketing Federation Ltd., Mumbai यांच्या नावे काढण्यात यावा.

५.  या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता श्रीमती अ.अ.चुरी, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री.रा.स.अटक, उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६.  सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं ३१७/१४/व्यय २, दिनांक ७.७.२०१४ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं ४४६/१४/अर्थ-१३, दिनांक १३.७.२०१४ अन्वये त्यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२२१५४५०४४३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kale Saguna D

Digitally signed by Kale Saguna D
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CMTD, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Kale Saguna D
Date: 2014.07.22 15:50:32 +05'30'

**(सगुणा काळे)**

कक्ष अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई,

२. अपर मुख्यसचिव (कृषी व पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मस्जीद, मुंबई-९,

४. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

६. कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,

९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई,

१०.वित्त विभाग, (व्यय-२, अर्थसंकल्प-३ व १३), मंत्रालय, मुंबई,

११.मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

१२.मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

१३.कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (३ प्रती),

१४.कक्ष अधिकारी, १७ स/संगणक कक्ष, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

१५.निवडनस्ती.